**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ, शरीरविकृती शास्त्रज्ञ संवर्गात नियमित पदोन्नतीने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र.पदोन्न-११०९/प्र.क्र.६६/सेवा-२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ०२ जून, २०११.**

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ (वेतनश्रेणी रु.१५६००- ३९१०० + ग्रेड पे ५४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी, गट अ मधील शरीरविकृती शास्त्रज्ञ संवर्गात पदोन्नतीच्या वाटयावरील पदावर पदोन्नती पात्र ठरलेल्या उमेदवारांना सोबतच्या **विवरणपत्र अ** मध्ये दर्शविल्याप्रमाणे रकाना २ येथील उमेदवारास रकाना ३ येथील प्रवर्गासाठी राखीव रिक्त पदासाठी महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ (वेतनश्रेणी रु.१५६००- ३९१०० + ग्रेड पे ६६००) या संवर्गात वैद्यकीय अधिकारी, **(शरीरविकृती शास्त्रज्ञ)**, गट अ मधील रकाना क्र. ४ येथील पदावर करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत पदोन्नती, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट -अ, शरीरविकृती तज्ञ संवर्गातील पदांच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार करण्यात आली आहे. तसेच सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई प्रलंबित याचिका क्र. ८४५२/०४ मधील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहेत.

३. सोबत जोडलेल्या विवरण पत्र अ मधील जे अधिकारी अनुसूचित जाती या प्रवर्गाचे आहेत व अद्याप ज्यांनी जात पडतळणी वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही अशा अधिकाऱ्यांना देण्यात आलेल्या पदोन्नत्या जात पडताळणी वैधता प्रमाणपत्र ३ महिन्याच्या आत सादर करण्याच्या अधिनतेने देण्यात येत आहेत. या अधिकाऱ्यांनी त्यांच्या जात प्रमाणपत्राची वैधता शासनास विहित कालमर्यादेत सादर न केल्यास त्यांना देण्यात आलेल्या पदोन्नत्या रदद करण्यात येतील.

४. सदर अधिकाऱ्याचे पदोन्नतीनंतरचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ नुसार निश्चित करण्यात यावे.

५. पदोन्नतीनंतर पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. या अनुषंगाने सदर अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर

आदेश प्राप्त झालेल्या दिनांकापासून एक महिन्याचे आत हजर व्हावे अन्यथा ते पदोन्नतीस इच्छूक नाहीत ते गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रदद करण्यात येईल. या प्रकरणी संबंधित उपसंचालक यांनी संबंधित अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबत अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत संचालक, आरोग्य सेवा व शासनास सादर करावा.

६. प्रस्तुत आदेश, साामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६५/११/१२, दि. १९.०३.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. आवश्यक अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

सदरचे आदेश www.maharashtra.gov.in वर साकेतांक क्र. २०११०६०२१७२९००००१ येथे प्रसिध्द करण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(राजेंद्र पवार)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

विभागीय आयुक्त,
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक (प्रशासन व अर्थसंकल्प), आरोग्य सेवा, मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व मंडळे)
जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, (संबंधित)
वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय/ उपजिल्हा/ कुटीर/ ग्रामीण रुग्णालय, संबंधित
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, (संबंधित)
संबंधित अधिकारी (विवरण पत्र अ मधील रकाना २ प्रमाणे)
निवडनस्ती, सेवा-२

| विवरण पत्र अ | | | | |
|---|---|---|---|---|
| शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. पदोन्न-११०९/प्र.क्र.६६/सेवा-२, दि. ०२ जून, २०११ चे जोडपत्र | | | | |
| शरीरविकृती शास्त्रज्ञ या संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस करण्यांत आलेल्या उमेदवारांना पदस्थापना - पदोन्नतीने नियुक्ती | | | | |
| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | निवडीचा प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची प्रस्तावित पदस्थापना |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | डॉ.सुरेश अरसुडे | खुला | स्वामी रामानंद तिर्थ ग्रा. व महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई, बीड | सामान्य रुग्णालय, अहमदनगर |
| २ | डॉ.प्र.च.छंचुरे | खुला | रक्त संक्रमण अधिकारी, जिल्हा रुग्णालय, सातारा | सामान्य रुग्णालय, उस्मानाबाद |
| ३ | डॉ. तुलसीदास लक्ष्मणराव भालेराव | अ.जा. | वैद्यकीय अधिकारी (रक्त संक्रमण अधिकारी), सिव्हील हॉस्पीटल, हिंगोली | सामान्य रुग्णालय, हिंगोली |
| ४ | डॉ. पदमा पुं. बकाल | खुला | वैद्यकीय महाविद्यालय, औरंगाबाद | सामान्य रुग्णालय, नाशिक |
| ५ | डॉ. शैला तु.मेदमवार भ.ज.(ब) | खुला प्रवर्गातून | सामान्य रुग्णालय, गडचिरोली | सामान्य रुग्णालय, गडचिरोली |
| ६ | डॉ. अशोक क.पारधे | अ.जा. | उपजिल्हा रुग्णालय, गंगापूर, औरंगाबाद | सामान्य रुग्णालय, बुलढाणा |
| ७ | डॉ.वि.बा.सोनावणे (अ.जा.) | खुला प्रवर्गातून | सामान्य रुग्णालय, अलिबाग, रायगड | सामान्य रुग्णालय, अलिबाग-रायगड |
| ८ | डॉ.स.म.जयस्वाल | खुला | डागा स्मृती रुग्णालय, नागपूर | सामान्य रुग्णालय, भंडारा |
| ९ | डॉ.रा.भा.शेजुळे | भ.ज.(क) | सामान्य रुग्णालय, जालना | सामान्य रुग्णालय, नंदुरबार |

**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ, शरीरविकृती शास्त्रज्ञ संवर्गात अभावित नियमित पदोन्नतीने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र.पदोन्न-११०९/प्र.क्र.६६/सेवा-२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- ०२ जून, २०११.**

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे ५४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी, गट अ मधील शरीरविकृती शास्त्रज्ञ संवर्गात नामनिर्देशनाच्या वाटयावरील पदावर अभावित पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांना सोबतच्या **विवरणपत्र ब** मध्ये दर्शविल्याप्रमाणे रकाना २ येथील उमेदवारास रकाना ३ येथील प्रवर्गासाठी राखीव रिक्त पदासाठी महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ (वेतनश्रेणी रु.१५६००- ३९१०० + ग्रेड पे ६६००) या संवर्गात वैद्यकीय अधिकारी, **(शरीरविकृती शास्त्रज्ञ),** गट अ मधील रकाना क्र. ४ येथील पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत पदोन्नती, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट -अ, शरीरविकृती शास्त्रज्ञ संवर्गातील पदांच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार करण्यात आली आहे. तसेच सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई प्रलंबित याचिका क्र. ८४५२/०४ मधील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहेत.

३. सोबत जोडलेल्या विवरण पत्र अ मधील जे अधिकारी अनुसूचित जमाती या प्रवर्गाचे आहेत व अद्याप ज्यांनी जात पडतळणी वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही अशा अधिकाऱ्यांना देण्यात आलेल्या पदोन्नत्या जात पडताळणी वैधता प्रमाणपत्र ३ महिन्याच्या आत सादर करण्याच्या अधिनतेने देण्यात येत आहेत. या अधिकाऱ्यांनी त्यांच्या जात प्रमाणपत्राची वैधता शासनास विहित कालमर्यादेत सादर न केल्यास त्यांना देण्यात आलेल्या पदोन्नत्या रदद करण्यात येतील.

४. सदर अधिकाऱ्याचे पदोन्नतीनंतरचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ नुसार निश्चित करण्यात यावे.

५. पदोन्नतीनंतर पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. या अनुषंगाने सदर अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर आदेश प्राप्त झालेल्या दिनांकापासून एक महिन्याचे आत हजर व्हावे अन्यथा ते पदोन्नतीस इच्छूक नाहीत ते गृहीत धरुन त्यांची अभावित पदोन्नती रदद करण्यात येईल. या प्रकरणी संबंधित उपसंचालक यांनी संबंधित अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबत अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत संचालक, आरोग्य सेवा व शासनास सादर करावा.

६. प्रस्तुत आदेश, साामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४६५/११/१२, दि. १९.०३.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. आवश्यक अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

सदरचे आदेश www.maharashtra.gov.in वर साकेतांक क्र. २०११०६०२१७२३५४००१ येथे प्रसिध्द करण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(राजेंद्र पवार)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

विभागीय आयुक्त,
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक (प्रशासन व अर्थसंकल्प), आरोग्य सेवा, मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व मंडळे)
जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, (संबंधित)
वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय/ उपजिल्हा/ कुटीर/ ग्रामीण रुग्णालय, संबंधित
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, (संबंधित)
संबंधित अधिकारी (विवरण पत्र अ मधील रकाना २ प्रमाणे)
निवडनस्ती, सेवा-२

## विवरण पत्र ब

**शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. पदोन्न-११०९/प्र.क्र.६६/सेवा-२, दि. ०२ जून, २०११ चे जोडपत्र**

**शरीरविकृती शास्त्रज्ञ या संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस करण्यांत आलेल्या उमेदवारांना पदस्थापना - पदोन्नतीने नियुक्ती**

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | निवडीचा प्रवर्ग | सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची प्रस्तावित पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | डॉ.मु.वि.देशपांडे | खुला | प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे | मध्यवर्ती रुग्णालय, उल्हासनगर-३ |
| २ | डॉ.मि.म.कुलकर्णी | खुला | उरो रुग्णालय तथा सामान्य रुग्णालय, पुणे | सामान्य रुग्णालय, ठाणे |
| ३ | डॉ.हि.मु.आळणे | अ.जा. | वैद्यकीय अधिकारी, ग्रामीण रुग्णालय, भोकर, जि.नांदेड | सामान्य रुग्णालय, वाशिम |
| ४ | डॉ.रा.व्यं.भोसले | खुला | प्राथमिक आरोग्य केंद्र, मांजरम, नांदेड | विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती |
| ५ | डॉ.रेखा ना. मुदखेडकर | अ.जा. | वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रुग्णालय, जालना | सामान्य रुग्णालय, जालना |
| ६ | डॉ.कल्पना श्री.कुलकर्णी | खुला | कुष्ठरोग निवारण पथक, परभणी | सामान्य रुग्णालय, खामगांव, जि.बुलढाणा |
| ७ | डॉ.सुवर्णा अ. पाटील | खुला | प्राथमिक आरोग्य केंद्र, मुरची, ता.शिरोळा | सामान्य रुग्णालय, सिंधुदुर्ग |
| ८ | डॉ.विकास आंबवडे (अ.जा.) | खुला | रक्त संक्रमण अधिकारी, पद्यभुषण वसंतदादा पाटील शासकीय रुग्णालय, सांगली | सामान्य रुग्णालय, सातारा |